ओ३म्

आर्यधर्म मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध झालेल्या विषयांची ग्रन्थमाला.

पञ्चमपुष्प.

# वैदिकविवाह व त्याचा उद्देश.

लेखक,

**श्रीदास विद्यार्थी.**

प्रकाशक,

**शामराव कृष्ण आणि मंडळी.**

ठाकुरद्वार, मुंबई.

किंमत पाऊण आणा.



१९०७.

वेदादिसच्छास्त्रांचें ज्ञान करून देणारें

# आर्यधर्म



## धार्मिक मासिक पुस्तक.

सोप्या भाषेंत मूल वैदिक धर्माची माहिती करून देणारें हें पहिलेंच पुस्तक चैत्र शके १८२६ मार्च सन १९०४ पासून निघूं लागलें आहे. सनातन आर्यधर्माची ओळख करून घेणारानें अवश्य या पुस्तकाचें वाचन करून आपलें अमोलिक ग्रंथसंग्रहस्थान सुशोभित करावें. अवघ्या चवदा आणे किंमतींत अंतर्बाह्य सुंदर, सुबक, मोठें व प्रगल्भ असें मासिक पुस्तक आर्यधर्मासारखें क्वचितच मिळेल, जिज्ञासूनीं याचा अनुभव घ्यावा. किंमत वर्षाची ट. ख. सह आगाऊ ८१४, व्हीं. पी. नें ८१९ नमुन्याकरितां अंक मागविणारांनीं दीड आण्याचीं टिकिटें पाठवावीं.

---

## विक्रीस तयार.

**आर्यधर्म**—मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या विषयांची ग्रन्थमाला.

**प्रथम पुष्प.**

### वैदिकधर्मस्वरूप.

प्रत्येक मनुष्यानें हा ग्रन्थ वाचून संग्रहीं ठेवण्यासारखा आहे; व वेदांविषयीं परकीयांच्या असलेल्या क्षुद्र कल्पनांना, हा ग्रन्थ म्हणजे उत्तर असून, वैदिकांना धर्मसंबंधीं शिक्षण देणारा शिक्षकच होय. याचीं २७६ पृष्ठें असून, किंमत अवघी एक रुपया आहे. कापडी बाईंडिंग पाहिजे असल्यास चार आणे अधिक पडतील.

**शामराव कृष्ण आणि मंडळी,**
प्रकाशक–आर्यधर्म.
ठाकुरद्वाराजवळ–मुंबई.

॥ ओ३म् ॥

# वैदिकविवाह.

" ईशप्रार्थना "

॥ ओम् मा विंदन् परिपन्थिनो य आसी-
दन्ति दम्पती ॥ सुगेभिर्दुर्गमतीता-
मप द्रान्त्वरातयः ॥ १ ॥

अथर्ववेद १४।२।११॥ ऋ. ८।३।२६।२ ॥

" हे परमेश्वरा! ( ये ) जे (परि–पन्थिनः) आड रस्त्यानें चालणारे दुष्ट व शत्रू या ( दम्पती ) स्त्रीपुरुषांवर ( आसीदन्ति ) आक्रमण करून येत आहेत ते यांना ( मा विदन् ) न जाणोत. अर्थात् त्या दुष्टापासून हीं स्त्रीपुरुषें दूर राहोत. हीं स्त्रीपुरुषें ( सुगेभिः ) उत्तम कृत्यांच्या व ज्ञानादि साधनांच्या योगानें ( दुर्गम् ) संकटांतून ( अतीताम् ) पार पडोत. ( अरातयः ) जे वैरी आहेत ते ( अप द्रान्तु ) सर्व प्रकारें नाश पावोत." तसेंचः—

" विद्वानांची प्रार्थना "

॥ ओम् सुमङ्गलीरियं वधूरिमां समेत पश्यत ॥
सौभाग्यमस्यै दत्त्वायाथास्तं विपरेतन २

अथर्व. १४।२।२८॥ ऋ. ८।३।२६।३॥

" विद्वान्लोक हो ! ( इयं वधूः ) ही स्त्री (सु-मङ्गलीः ) उत्तम कल्याणकारक गुणांनीं युक्त होईल अशा रीतीनें ( इमाम् ) हिला ( समेत ) करा व ( पश्यत ) पहा. अर्थात् ज्या रीतीनें हिला उत्तम सुखाची प्राप्ति होईल त्या रीतीनें हिची उन्नति करा. ( अस्यै ) हिला ( सौभाग्यम् ) उत्तम भाग्य (दत्वाय) देऊन (अथ) नंतर ( आस्तम् ) आपल्या घरीं (विपरेतन ) परत जा. तात्पर्य–ही वधू उत्तम गुणांनीं युक्त होईल व हिला उत्तम ज्ञान प्राप्त होईल आणि त्या योगानें हिचें भाग्य वृद्धि पावेल असें करा."

## वैदिकविवाह, त्याचा उद्देश व रहस्य.

आत्म्याला सुखाची प्राप्ति ज्ञानानें होते, ज्या मानानें अज्ञान किंवा मिथ्या ज्ञान असेल त्या मानानें दुःखच जास्त मिळेल व जसजसें ज्ञान वाढत जाईल तसतसें सुख वाढत जाईल ही गोष्ट निर्विवाद आहे. अज्ञानदशेपेक्षां सज्ञानदशा हीच सर्वांनीं पसंत केली जाते, याचें कारण तरी हेंच आहे. अज्ञान घालविण्यासाठीं जो हरएक मनुष्य धडपड करीत आहे तो सुद्धां त्या ज्ञानापासून आपणास सुख मिळावें याकरितां आहे; ज्ञानापासून सुख मिळणार नाहीं अशी जर मनुष्याची खात्री होईल, तर ज्ञानार्जन कोणीहि करणार नाहीं हें अगदीं उघड आहे. तात्पर्य **ज्ञान** हेंच सुखाचें साधन आहे हें सर्वसंमत आहे. आतां तें मिळवावयाचें कसें व कोणत्या योनींमध्यें तें मिळूं शकतें याचा विचार झाला पाहिजे. कीटपतंगापासून तों मनुष्यांपर्यंत अनेक योनि आहेत, त्या सर्व योनींमध्यें आत्म्याला ज्ञानार्जन करतां येत नाहीं. ज्ञान मिळविण्यासाठीं मनुष्याचेंच शरीर आत्म्याला घेणें भाग पडतें. आपण जर इतर योनींकडे लक्षपूर्वक पाहिलें तर आपणांस असें आढळेल कीं, त्यांना कांहीं स्वाभाविक ज्ञान असतें व तें न शिकवितां त्यांनां येत असतें; पण मनुष्याचें तसें नाहीं, याच्या जवळ थोडेंसें स्वाभाविक ज्ञान असतेंच; पण याच्या जवळ जें बुद्धिवैभव असतें व आई, बाप व गुरु या त्रयींकडून त्याला त्या बुद्धिवैभवाचा असा विस्तार करतां येतो कीं, त्याच्याकडून जसें या जगताचें व जगत्कर्त्याचें आकलन करतां येतें तसें इतर कोणत्याहि योनींतील प्राण्यांकडून होणें शक्यच नाहीं; म्हणूनच इतर प्राण्यांपेक्षां मनुष्याची योग्यता फार मोठी आहे असें सर्व मानतात.

मनुष्यदेहाचें श्रेष्ठत्व.

मनुष्याला ज्ञानार्जन करतां येतें, यासाठीं त्याची योग्यता मोठी आहे. आई, बाप व गुरु यांच्याकडूनच तें ज्ञान मिळतें, हा सर्वांचा अनुभव आहे. आई व बाप यांच्याशिवाय संतती होणार नाहीं, अर्थात् ज्ञान घेणारा उत्पन्न होण्यास स्त्री व पुरुष यांची सांगड अवश्य पाहिजे; व तशा रीतीनें तो उत्पन्न झाल्यानंतरच आई, बाप व गुरु

स्त्री व पुरुष.

हे त्याच्याठिकाणीं ज्ञानाची ज्योति पेटवितात व तिच्या उजेडानें तो मुक्ति प्राप्त करून घेण्यास योग्य होतो; म्हणून स्त्रीपुरुषांचा संबंध असणें आवश्यक आहे; शिवाय असें कीं, पुरुष व स्त्री यांचा स्वतंत्र रीत्या शारीरिक दृष्टीनें विचार केला असतां आपणास असें आढळून येईल कीं, एकाशिवाय दुसरा अपूर्ण, त्याचप्रमाणें स्त्रीशिवाय पुरुषहि अपूर्णच आहे. जशी पुरुषाशिवाय स्त्री अपूर्ण, त्याचप्रमाणें स्त्रीशिवाय पुरुषहि अपूर्णच. दोघेंहि एकत्र राहिलीं व दोघेंहि नियमपूर्वक वागूं लागलीं तरच त्या दोघांची पूर्णता होत असते. तात्पर्य कोणत्याहि दृष्टीनें जरी पाहिलें तरी स्त्रीपुरुषांची विवक्षित नियमांनीं संगति होणें इष्ट आहे, असेंच ठरतें.

"**यस्मात् त्रयोप्याश्रमिणो दानेनान्नेन चान्वहम् ॥ गृहस्थेनैव धार्यन्ते तस्माज्ज्येष्ठाश्रमो गृही** ॥ मनु० ॥ १ ॥ ज्याअर्थी दान व अन्न यांच्या योगानें गृहस्थ बाकीच्या, ब्रह्मचर्य, वानप्रस्थ व संन्यास या, तीनहि आश्रमांला स्वास्थ्य देतो, त्याअर्थी गृहस्थाश्रम हाच सर्वात् श्रेष्ठ आहे." असें स्मृतीमध्यें लिहिलेलें प्रत्यहीं अनुभवास येण्यासारखें आहे. ब्रह्मचर्याश्रमामध्यें स्वतःचें स्वतःला पोषण करतां येत नाहीं, व त्याचप्रमाणें वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांत असणाऱ्यांला स्वपोषणाचे उद्योग करण्यास वेळ नसतो; म्हणून हे तीन आश्रम पूर्णपणानें गृहस्थाश्रमावरच अवलंबून असतात. जसा ब्रह्मचाऱ्याचा वेळ विद्या मिळविण्यांत जातो

गृहस्थाश्रमाची योग्यता.

तसाच वानप्रस्थाचा वेळ विद्यार्थ्यांस विद्या शिकविण्यांत व संन्याशाचा वेळ उपदेश करण्यामध्यें जातो; म्हणूनच या तीनहि आश्रमांचा योगक्षेम गृहस्थानेंच चालविला पाहिजे, या दृष्टीनें पाहिलें असतांहि स्त्री व पुरुष यांना ज्या गृहस्थाश्रमांत एकचित्त ठेवतां येतें, तो आश्रम फारच महत्त्वाचा आहे असें ठरतें; अर्थात् यांच्या सुस्थितिवरच सामाजिक धार्मिक, राजकीय व इतर सुस्थिति अवलंबून आहे, असें म्हणावें लागतें.

गृहस्थाच्या सुस्थितिवर जर सर्व राष्ट्राची सुस्थिति अवलंबून आहे तर गृहस्थाश्रम कसा चालवावा याचें ज्ञान त्या आश्रमांत प्रवेश करूं इच्छिणाऱ्यांस व करविणाऱ्यांस

विवाह.

अवश्य हवें. स्त्रीपुरुषांनां धर्माच्या बंधानें कायमचें बांधणारा **विवाहसंस्कार** हाच एक संस्कार आहे; म्हणून जर या संस्कारांतील मर्म लोकांनां समजलें तर त्या लोकांकडून चुका होणार नाहींत व आपल्या जीवित्वाचें साफल्य होईल; यासाठीं जसें इतर संस्कारांचें तत्त्वज्ञान होण्याची आवश्यकता आहे त्याचप्रमाणें विवाहाचेंहि तत्त्व लोकांस समजण्याची आवश्यकता आहे; कित्येक समजतात कीं, स्त्रिया ही पुरुषांची मालमत्ता आहे; तर दुसरे कित्येक समजतात कीं, पुरुष हे स्त्रियांचे हुजरे आहेत, अशा ज्या अनेक समजुती

लोकांत आहेत त्या वैदिकविवाहाचें मर्म समजल्यावर नाहींशा होतील व दोघांलाहि आनंद होऊन दोघांच्या जीवाचें सार्थक्य होईल यांत शंका नको.

जसा इतर प्राण्यांमध्यें त्याचप्रमाणें मनुष्यामध्येंहि विवाह हवा तेव्हां करतां येणें जरी शक्य असलें, तरी तसें करणें अनिष्ट आहे. पशु आपल्या उपजत बुद्धीनें प्रवृत्त होत असल्यामुळे त्यांच्यामध्यें मनुष्यांइतका अनाचार नाहीं; प्राय: पशु अमोघवीर्य असतात, त्यांच्यांत स्त्रीपुरुषांचा एकदां संग झाला असतां प्राय: गर्भधारण होतें, याचें कारण जर आपण शोधूं लागलों तर पशूंमध्यें नियमितपणा आहे असें आपणांस आढळून येतें. मनुष्यांमधील नियमितपणा नाहींसा झाल्यामुळें संततीचा अभाव, अल्पायुषी व अशक्त संतति वगैरे परिणाम दिसत आहेत हें निर्विवाद आहे. जशी ही नियमपद्धति विवाहाच्या पूर्वी पाहिजे आहे. त्याचप्रमाणें विवाहानंतरहि पाहिजे आहे. विवाहापूर्वीच्या नियमपद्धतीला **"ब्रह्मचर्य"** असें म्हणतात. जो ब्रह्मचर्य उत्तम पाळतो त्यालाच विवाह करण्याचा खरा अधिकार येतो; ब्रह्मचर्याश्रमामध्यें विद्यार्जन व वीर्यरक्षण हे दोन उद्योग करावयाचे असतात. वीर्यरक्षणानें सर्व शरीर सुदृढ, निरोगी व हवें तें सत्कृत्य करण्यास योग्य असें बनतें व विद्यार्जनानें मन व बुद्धि यांवर सुसंस्कार होऊन सत्कार्य कोणतें व असत्कार्य कोणतें तें समजतें; अमुक केलें असतां उन्नति व अमूक केलें असतां अवनति होते असें ठरवितां येतें. सुदृढ शरीर व सुसंस्कृत बुद्धि यांच्याच योगानें सर्व प्रकारची उन्नति साधणें शक्य आहे; म्हणून ब्रह्मचर्य पाळल्यानंतरच विवाह करण्याची वेळ येते. धर्माच्या दृष्टीनेंहि ब्रह्मचर्य संपवून समावर्तन संस्कार झाला कीं, विवाह करण्याची योग्यता झाली असें होतें. अधार्मिक लोकांनीं ही विवाहाची मर्यादा मोडून बालविवाहाची घातुक चाल सुरू केली. बालविवाह करणें हें शास्त्रानें, युक्तीनें व अनुभवानें हीन ठरत असल्यामुळें सर्वांनीं त्याज्य मानणें उत्तम होय. सहाव्या किंवा आठव्या वर्षी उपनयन करून मुलाला ज्ञानार्जनाच्या व्यवसायांत लावावयाचें; चौवीस वर्षें ज्ञानार्जन केलें म्हणजे तिसाव्या किंवा बत्तिसाव्या वर्षी तो मुलगा विवाहाला योग्य ठरतो; त्याचप्रमाणें मुलगीहि सोळापासून वीस वर्षांच्या वयाला विवाहाला अनुरूप होते; म्हणूनच " **त्रिंशद्वर्षः षोडशाब्दां भार्यां विंदेतनग्निकाम्** ॥ महाभारते ॥ तीस वर्षांच्या मुलानें सोळा वर्षांच्या मुलीशीं विवाह करावा " असें महाभारतांत म्हटलें आहे. वैद्यशास्त्राच्या दृष्टीनें विचार केला असतांहि आपणांस आढळून येईल कीं पुरुष व स्त्री यांची अनुक्रमें तीस व, वीस या वर्षी वाढ पुरी होते तेव्हां त्याच्यापूर्वी जर दोघांचा संबंध झाला तर अकालीं मरण हाच त्याचा परिणाम होणार यांत शंका नको. रजोदर्शन हें स्त्रियांच्या पूर्ण वाढीचें चिन्ह आहे असें कित्येक अदूरदर्शी लोक म्हणतात; पण वैद्य-

विवाह करण्याची वेळ.

शास्त्राच्या दृष्टीनें तें नाहीं असें आतां ठाम झालें आहे, कारण कित्येक मुलींनां चवथ्या किंवा पांचव्या वर्षींहि रजोदर्शन झाल्याचीं उदाहरणें इंग्रजी वैद्यकाच्या पुस्तकांत दिलेलीं आहेत; म्हणून रजोदर्शन हें पूर्णवाढीचें द्योतक नाहीं. शिवाय समाजाची परिस्थिति खालावलेली असली, लहान मुलांच्या दृष्टीसमोर व्यभिचारादि प्रकार चालत असले, वाईट गोष्टी त्यांच्या कानावर येत असल्या म्हणजेहि त्यांची अकालीं परिपक्वता होते; म्हणून अशा दुष्ट संगतीपासून पुढील पिढीला अलिप्त ठेवून त्यांच्या मनाची व शरीराची पूर्ण वाढ होईल असें प्रत्येकानें करावें हें उत्तम आहे.

**विवाहाची व्याख्या.**

वधूनें व वरानें पूर्ण ब्रह्मचर्यव्रत पाळून विद्या व बल संपादन करून, अर्थात् शारीरिक, व मानसिक संपत्ति प्राप्त करून घेऊन, सर्व प्रकारें शुभगुणकर्मस्वभावयुक्त वधूवरांचा, उत्तम संतति उत्पन्न करण्यासाठीं व वर्णाश्रमानुकूल उत्तम उत्तम कामें करण्यासाठीं विवाहसमयीं स्थापन केलेल्या अग्निपूर्ण सर्वव्यापक परमेश्वराच्या सन्मुख, विद्वज्जन आणि आप्तइष्टवर्ग यांच्या समोर जो प्रतिज्ञापूर्वक संबंध जुळविला जातो, त्याला विवाह असें म्हणतात; हा विवाह झाला म्हणजे त्यांचा संबंध कायमचा झाला व पूर्वी सांगितल्याप्रमाणें सर्व प्रकारची जबाबदारी त्यांच्यावर आली.

**वधूच्या विवाहाचा दिवस.**

तीन वर्षेंपर्यंत रजस्वला होत असलेली वधू चवथ्यावर्षीं रजस्वला होऊन शुद्ध झाल्यानंतर एखादा उत्तम दिवस पाहून विवाह करावा. वधूवरांच्या वयाची इयत्ता पूर्वी सांगितली ; पण येथें वधू किती वेळ ऋतुस्नात झाल्यानंतर विवाह करावा हें दाखविलें आहे.

**विवाह संस्काराचा कार्यक्रम.**

सुगंधित शुद्ध जलानें पूर्ण अशा कलशांनीं वधूवरांनीं विवाहाच्या दिवशीं स्नान करावें हें स्नान ब्रह्मचर्याश्रमाची समाप्ति व सुसंतानोत्पत्त्यर्थ कामविचाराची उत्पत्ति यांचें सूचक आहे. स्नान करतेवेळीं “**ओं कामवेद ते नाममदो नामासि०।**” या मंत्राचा वधूवरांनीं व त्यांच्या आप्तइष्टांनीं उच्चार करावा. या प्राचीन संस्काराचें हल्लींचें मांगल्यस्नान हें अवशिष्ट रूप आहे ( २ ) वधूवरांनीं आपआपल्या घरीं उत्तम वस्त्रालंकार घालून उत्तम आसनावर पूर्वाभिमुख बसावें व तेथें ईश्वराची स्तुति, प्रार्थना, उपासना, स्वस्तिवाचन, शांतिसूक्त पठण करावें, नंतर अग्न्याधान, समिदाधान, स्थालीपाकादि यथोक्त कृत्यें करून सामान्य होमाहुति देऊन मंगलकार्याला योग्य असें सामगायन करावें किंवा ऐकावें. ( ३ ) नंतर वरानें वधूच्या घरीं जाण्याची तयारी करावी, वरपक्षाच्या मंडळीनें व वधूपक्षाच्या मंडळीनें विवाहोचित सामानाची सर्व तयारी केलेली असावी. ( ४ ) वराचा वधूच्या घरीं प्रवेश झाल्याबरोबर पालकानें मधुपर्कादिक विधि करून त्याचा सत्कार करावा. वराचा मधु-

पर्कानें सत्कार करावयाचा तो वधूपक्षाकडून प्रेमळ भाषण, आसन, पाद्य, अर्घ्य वगैरे साधनांनीं करण्यांत येतो. असा सत्कार केल्यानंतर वेदीच्या पश्चिम बाजूस केलेल्या उत्तम आसनावर वराला बसवून कार्यकर्त्यानें आचमनीयोदकासह जलपात्र वराला द्यावें. नंतर वरानें आचमन केल्यावर मधुपर्क अर्पण व प्राशन करून जलानें इंद्रियस्पर्श करावा नंतर यथाशक्ति वराला गोदानादि योग्य द्रव्याचें अर्पण करावें; म्हणजे मधुपर्क विधि पूर्ण झाला असें होतें. ( ५ ) नंतर वराकडून वधूचा सत्कार करण्याचा क्रम आहे तो येणेंप्रमाणें:—वधूला उत्तम वस्त्रें देणें, नेसावयाचीं व आंगावर घेण्याचीं वस्त्रें देणें व तिला अलंकार घालून सुशोभित करणें. यांच्यायोगानें वधूचा सत्कार केला जातो; याप्रमाणें वधूवराचा सत्कार झाल्यावर वधूवरांनीं आपआपलीं वस्त्रें घेऊन तयार होईपर्यंत विवाह-यज्ञमंडपांत कार्य कर्त्यांनीं अग्नि वगैरेची सिद्धता करून ठेवावी. तेथें वरपक्षाकडील एका मनुष्यानें उदककुंभ घेऊन उत्तराभिमुख बसावें व याप्रमाणें सर्व सामुग्री तयार करावी. ( ६ ) नंतर कार्य कर्त्यानें सालंकृत कन्येला वराच्या सन्मुख आणावें. या वेळीं सभामंडपांत वधूवरांनीं सर्वांसमक्ष पहिली प्रतिज्ञा करण्याचा मंत्र म्हणावयाचा तो असा:—

## प्रतिज्ञामंत्र.

**ओम् समंञ्जन्तु विश्वे देवाः समापो हृदं-यानि नौ ॥ सं मातरिश्वा सं धाता समुदेष्ट्री दधातु नौ ॥**

ऋ. ८।३।२८।७॥

"वर व वधू बोलतात कीं, ( विश्वे देवाः ) या यज्ञशाळेंत बसलेले विद्वान् लोक हो! आपण आम्हां दोघांला ( समञ्जन्तु ) निश्चयानें जाणावें कीं, आम्हीं स्वतःच्या अनुमतानें प्रेमपूर्वक गृहस्थाश्रमामध्यें एकत्र राहण्यासाठीं परस्परांचा स्वीकार करीत आहों. ( नौ ) आम्हां दोघांचीं ( हृदयानि ) अंतःकरणें ( आपः ) जलाप्रमाणें शांत व प्रीतिपूर्वक मिळालेलीं राहतील. जसा ( मातरिश्वा ) प्राणवायु आम्हांला प्रिय आहे त्याचप्रमाणें आम्ही दोघें ( सं ) एकमेकांच्या संगतीनें प्रसन्नयुक्त राहूं. जसा ( धाता ) जगताचें धारण करणारा परमात्मा सर्वांच्या ठिकाणीं ( सं ) प्राप्त झालेला आहे त्याचप्रमाणें आम्हीं दोघें एकमेकांस प्रीतीनें धारण करूं ( समुदेष्ट्री ) जसा उपदेश करणारा श्रोत्यांवर प्रीति करतो त्याप्रमाणें ( नौ ) आम्हां दोघांचा आत्मा परस्परांवर दृढ प्रेम ( दधातु ) धारण करो." ( ७ ) याप्रमाणें प्रतिज्ञा झाल्यानंतर

वधूवरांनीं यज्ञमंडपांत येऊन आपली प्रतिज्ञा कायम ठेवण्याचें बल प्राप्त होण्याविषयीं दोघांनीं प्रार्थना करावी. **ओम् भूर्भुवः स्वः अघोरचक्षुरपतिघ्न्येधि** मन्त्र म्हणून यज्ञकुण्डाची प्रदक्षिणा करून नंतर वराच्या दक्षिणभागीं वधूनें राहून "मी पतीच्या मार्गानें जाणारी व्हावें" अशी परमेश्वराची प्रार्थना करावी. या प्रार्थना चालल्या असतां मंगल वाद्यें वाजवावींत व (८) नंतर पुरोहितस्थापना करून आचमनापासून समिधादानादिक यज्ञकार्य करून आज्याहुती, लाजाहोम, अभ्यातान होमादि केल्यानंतर (९) पाणिग्रहण, (१०) शिलारोहण, (११) लाजाहोम, (१२) सप्तपदी, (१३) पूर्वस्थापितजलकुम्भांतून वधूच्या मस्तकावर जलसिञ्चन व सूर्य-दर्शन, (१४) हृदयस्पर्श, (१५) आशीर्वाद हे पूर्वविधि झाल्यानंतर (१६) ध्रुवदर्शन, (१७) सप्तऋषिसहित अरुंधतीदर्शन, (१८) यज्ञ अवशिष्टाचें भोजन, (१९) वामदेवगान वगैरे उत्तमविधि करून विवाहसमाप्ति करावी; नंतर वरात आल्यावर त्याच रात्रीं किंवा संस्कार झाल्यानंतर विद्वान् व आप्तइष्ट यांचा योग्य सत्कार करावा; याप्रमाणें विवाहसंस्काराचा संक्षेपानें कार्यक्रम आहे; आतां यांत येणाऱ्या मंत्रांच्या अर्थावरून वधूवरांचीं काय काय कर्तव्यें ठरतात तें पहावयाचें.—

## पाणिग्रहणमंत्र.

**ओम् गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः ॥ भगो अर्यमा सविता पुरन्धिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ॥** ऋ. ८।३।२७।१॥ अथर्व. १४।१।१।५०॥

"हे वरानने! जसा मी (सौभगत्वाय) ऐश्वर्यसुसंतानादि सौभाग्याच्या प्राप्ति-साठीं (ते) तुझा (हस्तम्) हात (गृभ्णामि) ग्रहण करतों व तूं (मया पत्या) मी जो पति त्यासह (जरदष्टिः) वृद्ध होईपर्यंत सुखपूर्वक (आसः) रहा. त्याच प्रमाणें, हे वीरा! मी सौभाग्याची वृद्धि होण्यासाठीं तुझा हात ग्रहण करतें, तूं मज स्त्रीसह वृद्धावस्था होईपर्यंत प्रसन्नतापूर्वक रहा. तुला मी व मला तूं आजपासून पतिपत्नीभावानें प्राप्त झालों आहों, (भगः) सकल ऐश्वर्ययुक्त, (अर्यमा) न्याय-कारी, (सविता) सकल जगाचा उत्पन्नकर्ता, (पुरन्धिः) बहुत प्रकारच्या जगाचें धारण करणारा परमेश्वर व (देवाः) हे सभामंडपांत बसलेले विद्वान् लोक (गार्हपत्याय) गृहस्थाश्रमकर्माच्या अनुष्ठानासाठीं, (त्वा) तुला (मह्यम्) मला

( अद्ुः ) देत आहेत. आजपासून मी तुला व तूं मला पूर्णपणें बांधले गेलों आहोंत, यासाठीं आम्ही परस्परांला अप्रिय होईल असें आचरण कधींहि करणार नाहीं."

**पतिपत्नीचें नातें कसें असावें ?**

या मंत्रावरून पतिपत्नीचें नातें कसें असावें हें पूर्णपणानें ठरत आहे. पति म्हणतो कीं, " मी सौभाग्य प्राप्त होण्यासाठीं आज तुझें पाणिग्रहण करीत आहें. तूं माझ्या-बरोबर वृद्धावस्था पुरी होईपर्यंत प्रेमपूर्वक रहावेंस." यावर पत्नी म्हणते कीं, " हे पति! मीहि कल्याणाच्या अभिवृद्धी-साठीं आपलें पाणिग्रहण करीत आहें, आपण मजबरोबर वृद्धावस्थेपर्यंत प्रसन्नतापूर्वक रहावें." हें बोलणें जमलेल्या सर्व विद्वानांसमोर होतें; हा तेथें एक प्रकारचा परमेश्वराच्या व विद्वानांच्या साक्षीनें धार्मिक करार केला जातो. हा करार मरेपर्यंत मोडणें शक्य नाहीं. पतीला पत्नी व पत्नीला पति हें दैवत या करारापासून झालें; या करारापुढें एकानें दुसऱ्याला सहाय्य केलें पाहिजे इतकेंच नव्हे तर कोणत्याहि रीतीनें कोणीहि अधार्मिक, अनैतिक व अप्रिय आचरण करतां नये. मग व्यभिचारादि दुष्ट कर्म कोणीहि करतां नये हें निराळें सांगणें नको. तसेंच—

**ओम् भगंस्ते हस्तंमग्रहीत् सविता हस्तं-मग्रहीत् ॥ पत्नी त्वमंसि धर्मणाहं गृह-पंतिस्तवं ॥** अथर्व. १४।१।१।५१।

"हे प्रिये! ( भगः ) ऐश्वर्ययुक्त असणारा मी ( ते हस्तम् ) तुझा हात (अग्रहीत्) ग्रहण करतों, तसेंच ( सविता ) धर्मयुक्त कामामध्यें प्रेरणा करणारा मी तुझ्या हाताच ग्रहण करतों ( त्वम् ) तूं ( धर्मणा ) धर्मानें माझी (पत्नी) स्त्री आहेस व ( तव ) तुझा मी (गृहपतिः) गृहपति आहें. आम्हीं दोघें मिळून गृहकृत्यांची सिद्धता करूं. जें दोघांला अप्रियाचरण व्यभिचारादिक आहेत तें आम्ही कधींहि करणार नाहीं. ज्याच्या योगानें सर्व उत्तम कामें होतील, आम्हांला उत्तम संतति होईल, उत्तम ऐश्वर्य वाढेल व उत्तम सुख होईल असेंच कृत्य आम्ही करून आपली उन्नति करून घेऊं " तसेंचः—

**ओम् ममेयमंस्तु पोष्या मह्यं त्वादाद् बृह-स्पतिः ॥ मया पत्यां प्रजावति सं जीव-शरदंः शतम् ॥** अथर्व. १४।१।१।५२॥

" हे अनघे! ( बृहस्पतिः ) सर्व जगाचें पालन करणाऱ्या परमेश्वरानें ( त्वा ) तुला ( मह्यम् ) मला (अदात्) दिलें आहे. ( इयम् ) ही तूं सर्व प्रकारें माझ्याकडून ( पोष्या ) पोषण करण्यास योग्य अशी ( अस्तु ) हो. हे ( प्रजावति ) तूं ( मया पत्या ) मी जो पति त्यासह ( शतं शरदः ) शंभर शरदतु अर्थात् शंभर वर्षेपर्यंत ( शं जीव ) सुखानें रहा." या मंत्रांत दिलेल्या प्रतिज्ञेवरून काय बोध घ्यावयाचा तो अगदीं स्पष्ट आहे. या प्रतिज्ञेप्रमाणेंच वधूनेंहि अशीच प्रतिज्ञा करावयाची ती अशी, " हे वीरा! परमेश्वराच्या कृपेनें आपण मला प्राप्त झाले आहांत, आपल्या वांचून मला दुसरा कोणीहि पालक, सेव्य व देव नाहीं. मी आपणाशिवाय दुसऱ्या कोणावर प्रेम करणार नाहीं व आपणहि त्याचप्रमाणें दुसऱ्या कोणत्या स्त्रीवर प्रेम करूं नये. अशा रीतीनें आनंदानें आम्ही एकत्र शंभर वर्षेपर्यंत रहावें." तसेंच.

**ओम् त्वष्टा वासो व्यदधाच्छुभे कं बृहस्पतेः प्रशिषां कवीनाम् ॥ तेनेमां नारीं सविता भगश्च सूर्यामिव परिधत्तां प्रजया ॥**

अथर्व. १४।१।१।५३॥

" हे शुभानने! ज्याप्रमाणें या परमेश्वराच्या सृष्टीमध्यें त्याच्या व ( कवीनाम् ) विद्वानांच्या ( प्रशिषा ) उत्तम शिक्षणानें दंपत्यें उत्तम रीतीनें नांदतात व जशी ( त्वष्टा ) विद्युत्शक्ति ही सर्वत्र व्याप्त झालेली असते; त्याचप्रमाणें तूं माझ्या प्रसन्नतेसाठीं ( वासः ) सुंदरवस्त्र, ( शुभे ) उत्तम आभूषण यांनां धारण करून ( कम् ) माझ्याकडून सुख मिळीव. या माझ्या व तुझ्या इच्छेला परमेश्वर ( व्यदधात् ) सिद्ध करो. तसा ( सविता ) सर्व जग उत्पन्न करणारा परमेश्वर व ( भगः ) पूर्ण ऐश्वर्ययुक्त ( प्रजया ) उत्तम प्रजेच्या योगानें ( इमाम् ) या तुला अर्थात् ( नारीम् ) मी जो नर त्याच्या स्त्रीला ( परिधत्ताम् ) शोभायुक्त करो व त्याचप्रमाणें मीहि ( तेन ) या सर्व साधनांनीं ( सूर्यामिव ) सूर्याच्या शोभेप्रमाणें वस्त्रभूषणादिकांनीं सुशोभित ठेवीन." याचप्रमाणें स्त्रीनेंहि प्रतिज्ञा करावी. तसेंचः—

**ओम् अहं विष्यामि मयि रूपमस्या वेददित् पश्यन्मनसः कुलायम् ॥ न स्तेयमद्मि मनसोदमुच्ये स्वयं श्रथ्नानो वरुणस्य पाशान् ॥** अ. १४।१।१।५७॥

"हे कल्याणकारिणि! ज्याप्रमाणें ( मनसः ) मनानें ( कुलायम् ) कुलाच्या वृद्धीला ( पश्यन् ) पाहत ( अहम् ) मी ( अस्याः) या तुझ्या ( रूपम् ) रूपाला ( विष्यामि ) प्रीतीनें प्राप्त होईन; जसें मी निष्कपट प्रेम तुझ्यावर करतों त्याचप्रमाणें तूं ( मयि वेदत् ) माझ्यावर निष्कपट प्रेम ठेव. ज्याप्रमाणें मी ( मनसा ) मनानेंहि तुझ्याशीं ( स्तेयम् ) चोरी करणें ( उदमुच्ये ) सोडून देत आहें व कोणत्याहि उत्तम पदार्थाचा चोरीनें ( न आश्नि ) भोग करीत नाहीं, ( स्वयनू ) स्वतः मी ( श्रन्थानः ) पुरुषार्थानें शिथिल झालों असतांहि ( वरुणस्य ) उत्कृष्ट व्यवहारांतील विघ्नीभूत दुर्व्यसनी पुरुषाच्या ( पाशान् ) पाशाला दूर करतों, त्याचप्रमाणें ( इत् ) खरोखर तूंहि करीत असावेंस. याप्रमाणें वधूनेंहि प्रतिज्ञा करावी."

या प्रतिज्ञामंत्रावरून उघड होतें कीं पतीनें स्त्रीशीं किंवा पत्नीनें पतीशीं कपट कधींहि करतां नये. कोणताहि व्यवहार एकमेकांनां कळविल्या वांचून करतां नये. भक्ष्यभोज्यादि पदार्थहि एकमेकांनीं एकमेकांनां न कळत भक्षण करूं नये असें ज्या अर्थीं वेद म्हणतो; त्या अर्थीं दोघांचें किति ऐकमत्य प्रत्येक व्यवहारांत असलें पाहिजे याचा उलगडा सहज होतो. पति व पत्नी हीं दोघेंहि विद्वान् व एकमेकांस प्रसंग विषयीं उत्तम सल्ला देण्यास योग्य अशींच असलीं पाहिजेत हें या मंत्रावरून उघड होत आहे. दोघांतून जरी एक अज्ञानी व असंस्कृत असेल तरीहि त्यांच्या मध्यें या मंत्रांत वर्णिलेलें प्रेम राहणार नाहीं व जरी राहिलें तथापि एक-मेकांचा जसा उपयोग व्हावयास पाहिजे, त्याप्रमाणें होणार नाहीं हें अगदीं उघड आहे; म्हणून दोघांचीं मनेंहि उत्तम सुसंस्कृत होतील अशी व्यवस्था करणें इष्ट आहे.

**पतिपत्नीचें परस्पर वर्तन.**

## लाजाहोममंत्र.

**ओम् इयं नार्युपब्रूते लाजानावपन्तिका ॥ आयुष्मानस्तु मे पतिरेधन्तां ज्ञातयो मम स्वाहा ॥** इदमग्नये, इदन्न मम ॥

"ही स्त्री होमामध्यें लाह्या घालीत असतां असें म्हणते कीं, माझा पति पूर्णायुषी होवो व माझे ज्ञाति बांधव सुखानें आनंदित होवोत. हें खरें असो, म्हणून ही आहुति अग्नींत देत आहें, ही माझी नव्हे." या मंत्रावरून उघड होत आहे कीं, स्त्रीनें नेहमीं पतीचें आयुष्य कसें वाढेल, त्याला आनंद कशानें होईल याचें चिंतन व तदनुसार यत्न करीत असलें पाहिजे.

## सप्तपदीचे मंत्र.

**ओम् इष एकपदी भव सा मामनुव्रता भव विष्णु स्त्वा नयतु पुत्रान्विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयः ॥ १ ॥ ओम् ऊर्जे द्विपदी भव० ॥ ओम् रायस्पोषाय त्रिपदी भव० ॥ ओम् मयोभवाय चतुष्पदी भव० ॥ ओम् प्रजाभ्यः पञ्चपदी भव० ॥ ओम् ऋतुभ्यः षट्पदी-भव० ॥ ओम् सखे सप्तपदी भव० ॥**

"हे स्त्रिये ! तूं अन्नादि भोग्यपदार्थ प्राप्त करण्यासाठीं, तेजस्विता प्राप्त होण्यासाठीं, धन व ऐश्वर्य मिळण्यासाठीं, मनाला आनंद प्राप्त होण्यासाठीं, प्रजा होण्यासाठीं सहा ऋतु सुखानें व आनंदानें जावे म्हणून व आम्हांमध्यें परस्पर सख्य वाढावें; म्हणून मी धर्माचें आचरण करतों त्याप्रमाणें तूंहि आचरण करीत जा. परमेश्वर तुला तशी बुद्धि देवो. अशा रीतीनें राहून आम्हांला पुष्कळ पुत्र होवोत व ते सर्व वृद्ध होईपर्यंत जगोत."

या मंत्रामध्यें पुरुषांला स्त्रियांचें कोणकोणत्या गोष्टींत सहाय्य होऊं शकतें हें सांगितलें आहे. (१) भोग्यपदार्थ संपादन करणें, (२) तेजस्वी बनणें, (३) संपत्ति मिळविणें. (४) मानसिक आनंद मिळविणें, (५) संतति उत्पन्न करणें, (६) आयुष्य सुखानें घालविणें, (७) व परस्परांतील प्रेम वाढविणें या सर्व बावतींत जसें स्त्रियांनीं पुरुषाला सहाय्य दिलें पाहिजे त्याचप्रमाणें पतीनेंहि पत्नीला सहाय्य दिलें पाहिजे. जेव्हां समाजामध्यें अशाप्रकारें पुरुषांस, हरएक बावतींत मदत करणाऱ्या स्त्रिया होतील तो सुदीन होय. ही स्थिति येण्यास त्यांस सुशिक्षण हेंच एक अमृत दिलें पाहिजे हें अगदीं उघड आहे.

**स्त्रीचें पुरुषास सहाय्य.**

## आहुतिमंत्र.

**ओम् अघोरचक्षुरपतिघ्न्येधि शिवा पशुभ्यः सुमनाः सुवर्चाः ॥ वीरसूर्देवृकामा-स्योना शन्नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥**

ऋ. ८।३।२८।४॥

"हे प्रिये ! तूं (अपतिघ्नि) पतीचें हनन न करणारी अर्थात् त्याच्याशीं विरोध न

करणारी, ( अघोरचक्षुः ) डोळे वटारून न पाहणारी अर्थात् नेहेमीं हास्य मुख करून बोलणारी हो; तसेंच घरांतील ( पशुभ्यः ) गाई वांसरांचें उत्तम ( शिवा ) कल्याण करणारी हो; तसेंच ( सुमनाः ) उत्तम विचारशील व ( सुवर्चाः ) उत्तम गुण कर्म व स्वभाव यांनीं युक्त हो. तसेंच ( वीरसूः ) वीरांला प्रसवणारी हो व ( देवृकामा ) दीरांनां सुख देणारी, त्यांच्याशीं विरोध न करणारी व ( स्योना ) सर्व रीतीनें सुख देणारी हो; तसेंच ( नः ) आमच्या ( द्विपदे ) घरांतील माणसांचें व ( चतुष्पदे ) गाई वांसरांचें ( शम् ) कल्याण करणारी हो."

या मंत्रामध्यें स्त्रियांवरची जबाबदारी फारच वर्णिली आहे. मंत्राचा उद्देश असा दिसतो कीं, आर्यांच्या समाजामध्यें अशा प्रकारच्या स्त्रिया असाव्या, अर्थात् अशा प्रकारच्या स्त्रिया उत्पन्न होतील असें सुशिक्षण त्यांस दिलें पाहिजे व त्याच मानानें उच्च पुरुषांनांहि मिळालें पाहिजे. **स्त्रियांची योग्यता अशी असावी असें सांगण्यानेंच पुरुषांची किती असावी हें उघड ठरत असतें.** घरांतील मनुष्यांचें व गाई वांसरांचें कल्याण करण्यांत तर स्त्रिया तत्पर असल्या पाहिजेत पण याशिवाय **त्या वीरांनां उत्पन्न करणाऱ्याहि असल्या पाहिजेत.** हें मंत्रांतील विधान पाहण्यासारखें आहे. स्त्रिया ह्या केवळ चुलीपुढेंच राहणाऱ्या नसून त्या भावीपिढीमध्यें मोठमोठीं कार्यें करणारे वीर उत्पन्न करणाऱ्या **वीरमाता** आहेत हें जसें पुरुषांनीं तसें स्त्रियांनींहि लक्षांत ठेवलें पाहिजे. शेळपट, मंदमति व पांचरुपयांच्या नोकरीसाठीं जोडे झिजविणारे पुत्र उत्पन्न करून आपलें व आपल्या देशाचें नांव धुळीस मिळविणारांचें काम करण्यापेक्षां वांझपण चांगले असें कंठरवानें वेद सांगत आहे. विवाह प्रकरणांतील हा मंत्र सर्वांस असा उपदेश करीत आहे कीं तुम्ही आपलीं मुलें तेजस्वी निपजतील असा प्रयत्न करा. **शरीरानें, मनानें, विद्येनें, बुद्धीनें, कौशल्यानें, योग्यतेनें, मानानें व इतर गुणांनीं आपलीं मुलें थोर झालीं पाहिजेत, तीं तेजस्वी निघालीं पाहिजेत, त्यांनीं जगांत नांव केलें पाहिजे, त्यांनीं आपला, आपल्या धर्माचा व आपल्या देशाचा उद्धार केला पाहिजे, आपलीं मुलें इतिहास वाचणारीं न होतां इतिहास करणारीं झालीं पाहिजेत** हा उपदेश व याहीपेक्षां जास्ती उपदेश वरील मंत्रांतील " **वीरसूः** " या शब्दांत आहे. हा शब्द अत्यंत महत्त्वाचा आहे, विवाहप्रकरणांतील सर्व मंत्रांचा भाव या एका शब्दांत सांठवला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तात्पर्य वरि उत्पन्न करणाऱ्या माता झाल्या पाहिजेत. " वीरयति अमित्रान् " जो अहित करणाऱ्यांचें निवारण करतो तो वीर होय. अहित पुष्कळ प्रकारचें आहे. धार्मिक अहित करणारे नास्तिक लोक असतात त्यांचें निवारण करणारे ते **धर्मवीर** होत. अज्ञाना-

वीर प्रसवणाऱ्या स्त्रियांची आवश्यकता.

वीर शब्दाचा अर्थ.

मुळें अनाचार अनीति वगैरे आचरणारे जे असतात ते लोकांची फारच हानि करतात, म्हणून अशा जनसमाजाच्या अज्ञानाचा हरएक प्रकारें जे नाश करण्यास काया वाचा मनें करून झटतात ते **ब्रह्मवीर** होत. राष्ट्रामध्यें पारतंत्र्य उत्पन्न करण्यास जे सहाय्य करतात किंवा जे परचक्रांत सामील असतात असे जे देशाचे शत्रु आहेत त्यां सर्वांचें निर्दलन करून स्वातंत्र्याचा उज्ज्वल प्रकाश पाडणारे जे रणधुरंधर असतात, ते **रणवीर** या नांवानें नांवाजले जातात. परदेशी मालानें आपल्या देशी व्यापार धंद्यावर स्वारी करून जें व्यापारी आक्रमण चालविलेलें असतें त्यावेळीं स्वदेशवस्तूंवर प्रीति उत्पन्न करून, स्वदेशांत उद्योगधंदे व स्वदेशाचा व्यापार यांची भरभराट करण्यास जे सत्पुरुष कारणीभूत झालेले असतात ते **वणिग्वीर** होऊन शोभूं लागतात. अशाच प्रकारानें मनांतील दुष्टवासनांचें व आत्मशुद्धीचें संयमनादि काम करणारे असतात ते **योगवीर** होत. अशाप्रकारचे जे अनेक वीर आहेत तसे आपले पुत्र व्हावेत; यासाठीं स्त्रीपुरुषांचे प्रयत्न झाले पाहिजेत, हें सर्वस्वीं त्यांच्या आधीन आहे. असा उपदेश वरील मंत्रांत केलेला आहे.

वीरपुत्र उत्पन्न व्हावेत असें सर्वांस वाटत असेल पण ते उत्पन्न कसे व्हावेत, याला काय उपाय आहेत, ते समजण्याची कोणाला इच्छा उत्पन्न होईल. तर त्याचें

**सुपुत्र निपजण्याचे उपाय.**

उत्तर वरील विवाहमंत्रांतच आहे. "**अघोरचक्षुः**" या पदानें असें दर्शविलें आहे. कीं, स्त्रीपुरुषांचें परस्पर आचरण क्रोधयुक्त नसावें, प्रेमानें व ममतेनें एकमेकांनीं वागावें. अशा रीतीनें हीं नवराबायको प्रेमानें वागूं लागलीं असतां तीं प्रचलित विषयांच्या गोष्टी करतील. समाजामध्यें काय चाललें आहे, राजकीय विषय कोणते उपस्थित आहेत व त्यांची चर्चा कशी काय चाललेली आहे, धर्माची स्थिति कशी आहे, व कोणत्या बाबतींत न्यूनता आहे, सांपत्तिक व व्यापाराची आपल्या देशांतील स्थिति कशी आहे इत्यादि प्रश्नांचा खल तीं प्रेमानें वागणारीं स्त्रीपुरुषें आपआपसांत विचार करून करतील व त्या विचारांचा परिणाम त्यांच्या रजवीर्यांवर होऊन त्यांचीं मुलें त्यांच्या विचारांच्या अनुरूप निपजतील. तसेंच "**सुमनाः**" हें पुढील पदहि दोघांचीं मनें सुसंस्कृत झालीं पाहिजेत असें दाखवीत आहे. **सत्यप्रियता व सुविद्या यांच्या योगानें मन सुसंस्कृत होतें. जशी सत्यप्रियता व सुविद्या पुरुषांस पाहिजे तशीच ती स्त्रियांसहि पाहिजे** सत्यप्रिय मनुष्य स्पष्टवक्ता, निस्पृह व उदार असतो, तसा हांजीहांजी करणारा व स्तुतिपाठक नसतो; म्हणून स्त्रीपुरुषें जर सत्यनिष्ठ असतील तरच त्यांचे पुत्र वीर होतील असें वरील मंत्रांत ध्वनित केलें आहे. स्तुतिपाठक, पारतंत्र्यशील, कुविचारी, स्वार्थी, अस्वाभिमानी आईबापांचीं मुलें नर अजागल स्तनाप्रमाणें निघालीं तर त्यांत

काय आश्चर्य ! यासाठीं वरील श्रुतींतील "**सुमनाः**" हा शब्द प्रत्येकानें लक्षांत ठेवून तशी स्थिति आपली करण्याचा प्रयत्न करावा. मनानें सुसंस्कृत, उत्तम विद्वान्, करारी, स्वाभिमानी अशा आईबापांचीं मुलें उत्तम वीर निपजतील यांत शंका नाहीं; याप्रमाणें मनाची स्थिति झाल्यानंतर "**सुवर्चाः**" हें पद पाहण्यासारखें आहे. या पदानें उत्तम गुण, उत्तम कर्मे, उत्तम स्वभाव व उत्तम विद्येची तेजस्विता हे गुण स्त्रीपुरुषांमध्यें असावेत असें ध्वनित केलें आहे. उत्तम विचारी आईबापाची उत्तम संतति होईल हें खरें पण त्यांतहि जर तीं उत्तम कृत्यें करण्यांत तत्पर असतील तर त्याहून उत्तम संतति होईल. जे विचार व जीं कृत्यें आईबाप करीत असतात त्यांचा परिणाम त्यांच्या रजवीर्यावर होऊन तशीं मुलें त्यांनां होतात. क्षत्रियगुण संपन्न आईबापांचीं मुलें उत्तम क्षत्रिय व ब्राह्मणगुणसंपन्न सात्विक आईबापांनां तशीं सात्विक मुलें साधारणतः होतात. जर दोघांमध्यें स्वभाववैषम्य असेल तर मात्र मुलांमध्यें विषम स्वभाव उत्पन्न होतात पण जर आईबापांच्या मनामध्यें एका विशिष्ट विषयाचें तादात्म्य झालेलें असेल तर तो गुण निश्चयानें मुलांमध्यें येतोच येतो. या शारीरशास्त्राच्या नियमाला धरूनच वरील मंत्रांतील पदें आहेत. हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. तात्पर्य जर वर लिहिल्याप्रमाणें आपले पुत्र वीर निपजावेत. असें वेदाचें सांगणें स्त्रीपुरुषांनां ऐकावयाचें असेल तर आपण दोघांनींहि विद्वान् होऊन वीरत्वाचे गुण अंगीं आणावे व विचार आणि कृति तशीच ठेवावी म्हणजे तशीं वीरगुणयुक्त मुलें निःसंशय होतील.

विवक्षित प्रकारच्या स्वभावांचीं कार्यकर्तीं मुलें उत्पन्न करणें हें स्त्रीपुरुषांच्या हातांत आहे, हें दाखविण्यासाठींच वरील मंत्रांत "**वीरसूः**" हें पद घातलेलें आहे. वाईट मुलें होणें याचा सर्वस्वीं दोष आईबापांवरच आहे. तेव्हां या दोषांतून सुटण्याचा त्यांनीं नेहेमीं प्रयत्न करीत असावा.

**आईबापांवरची जबाबदारी**

विषयोपभोगाच्या इच्छेनें जर स्त्रीपुरुषें रत होऊं लागलीं तर त्यांची संतति विषयी व स्वार्थी निघेल, पण जर राजकीय, सामाजिक, धार्मिक नैतिक विषयांवर उत्तम रीतीनें वाटाघाट करणारे आईबाप असतील तर त्यांची संतती तशी होईल. आईबापांची जबाबदारी येथेंच थांबत नाहीं. मुलें उत्पन्न झाल्यावर तीं कोणाच्या संगतींत वागत आहेत, त्यांच्या कानांत कोणते शब्द पडत आहेत व तीं कोणत्या पाठशाळेंत अभ्यास कसा करीत आहेत; यांकडे आईबापांचें नीट लक्ष पाहिजे. लहानपणीं जसें त्यांच्या मनाला वळण द्यावें तसें तें वळतें. जर लहानपणीं चांगल्या मुलांची त्यांना संगति असली, चांगले उदात्त उपदेश त्यांच्या कानांत पडत असले व उत्तम गुरूच्या हाताखालीं त्यांचें शिक्षण होत असलें तरच तसे **वीर** उत्पन्न होण्याची शक्यता असते. एका मुलाचें पालन व विद्याध्ययन करण्याचें सामर्थ्य नसतां दहा पांच मुलें

झालीं म्हणजे गांवाला उपद्रव देणारीं माणसें उत्पन्न केल्याचेंच श्रेय त्यांस मिळणार हें निर्विवाद आहे; या सर्व गोष्टीचा विचार आईबापांनीं अवश्य केला पाहिजे. त्यांच्या आचरणावर पुढची पिढी अवलंबून आहे ते जसें पुढच्या पिढीला वळण लावतील तशी त्यांची उन्नति होईल. " **बाळपणीं बाळांची कोमल तरुतुल्य बुद्धि वांकेल ॥ घेईल ज्या गुणांला तो गुण मतिवेष्टुनीहि फांकेल ॥१॥**" ही मराठी कवीची उक्ति ध्यानांत ठेवून आईबापांनीं आपलीं मुलें **वीर** निपजतील अशी व्यवस्था करावी.

अशाप्रकारें वेदमंत्रांतील भाव अनेक प्रकारानें उत्तम आहेत. त्या सर्वांचें वर्णन येथें करूं लागल्यास विस्तार फार होईल. वैदिकविवाहाचें रहस्य वधूवरांच्या अंतःकरणांत बिंबून त्यांच्यावरची जबाबदारी त्यांच्या लक्षांत यावी हाच उद्देश येथें आहे. जे मंत्र विवाह प्रकरणांत घातलेले आहेत ते सर्व स्त्रीपुरुषांचीं कर्तव्यें काय काय आहेत हें दाखवीत आहेत. त्या उपदेशाचें थोडेंसें दिग्दर्शन येथें केलें आहे. **राष्ट्राला विशिष्ट वळण देणें, समाजाची उत्तम स्थिति करणें, धर्माचा ध्वज उभारणें, नैतिक आचरण सुधारणें, व्यापारी चढाओढींत आपला पाय पुढें ठेवणें, स्वाभिमान कायम राखून नांव मिळविणें वगैरे करण्याला पुढील पिढींत कशीं जोमदार माणसें पाहिजेत तीं उत्पन्न करणें तुमच्या आधीन आहे, असें वेदमंत्र विवाहाच्या वेळीं स्पष्टपणानें प्रत्येक जोडप्याला सांगत आहेत.** पण बालविवाहाची पद्धत जोंपर्यंत समाजांत सुरू असेल तोंपर्यंत हें घडणार कसें? कारण, मंत्र कोणते म्हटले जात आहेत व त्यांपासून आम्ही काय बोध घ्यावयाचा हें जर त्या अर्भकांनां समजलें नाहीं तर त्यांनीं पुढें करावें तरी काय?

प्रौढ विवाहाची आवश्यकता.

आपण करीत आहों काय व आम्हांला कोणता उपदेश मिळाला आहे हें समजण्याची ज्यांची योग्यता आहे अशा प्रौढ वधूवरांचाच विवाह होणें वैदिक पद्धतीनें योग्य आहे. विवाह हा पोरांचा खेळ नसून भावीपिढीच्या उन्नतीचा तो उगम आहे. हें प्रत्येक विचारी माणसानें अवश्य लक्षांत ठेवलें पाहिजे व शहाणपणानें आपल्या उन्नतीचा मार्ग नेटानें आक्रमीत असलें पाहिजे यांतच पुरुषार्थ आहे. हेंच वैदिकविवाहाचें रहस्य आहे व हाच त्याचा उद्देश आहे. वैदिकविवाह स्त्रीपुरुषांनां कामुक होण्यास मदत देत नाहीं तर ऋतुगामी होऊन नियमित व्हा व अमोघवीर्य व्हा म्हणून सांगत आहे, आपण सूज्ञ होऊन आपल्या संततीला बाणेदार करा असें सांगत आहे व शंभर कुपुत्र होण्यापेक्षां एकच पण सुलक्षणी पुत्र होईल असें करा असा उपदेश करीत आहे याचा प्रत्येक वधूवरानें विचार केला पाहिजे.

या प्रकारचा हा विवाहसंस्काराचा इत्यर्थ आहे. याचा लाभ या वधूवरांस व त्याच-प्रमाणें सर्व इतर वधूवरांस होवो हीच परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. शेवटीं:—

## "ओम् सौभाग्यमस्तु । ओम् शुभं भवतु ॥"

"परमेश्वराच्या कृपेनें वधूवरांचें भाग्य दररोज शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वृद्धिंगत होत जावो व त्यांचें, त्यांच्या संततीचें व मुख्यतः त्यांच्या राष्ट्राचें सर्व प्रकारानें कल्याण होवो" असें मनःपूर्वक परमेश्वराला प्रार्थून ही अर्पणपत्रिका येथें समाप्त करतों.

## द्वितीय पुष्प.

## ब्रह्मचर्य.

प्रत्येक आईबापानें आपल्या बालकांच्या हातीं देण्यासारखा, त्यांच्याकडून वाचून घेण्यासारखा व त्यांना समजावून देण्यासारखा हा ग्रंथ आहे. राम, भीष्म, अर्जुनादि वीर तसेच महान् महान् ऋषि यांच्यासारखी दीर्घायुषी, बलसंपन्न, पराक्रमी, बुद्धिमान्, नीतिज्ञ संतति निर्माण करण्याला शिक्षणरूपच हा ग्रंथ आहे. याचीं ६८ पृष्ठें असून किंमत अवघी चार आणे आहे.

---

## तृतीय पुष्प.

## राष्ट्रीय उन्नतीचीं तत्त्वें.

प्रत्येक राष्ट्रभक्तानें हा ग्रंथ वाचून अमलांत आणण्यासारखा आहे ह्याचीं पृष्ठें ४४ असून सर्वांस घेण्यास सोईवार पडावा म्हणून किंमत दोनच आणे ठेविली आहे. तीनहि ग्रन्थांचा टपालखर्च निराळा पडेल.

---

## चतुर्थ पुष्प.

## राष्ट्रीसूक्त व त्याचा स्पष्टीकरणासह अर्थ.

हें मालेंतील चवथें पुष्प आहे. ह्या पुस्तकामध्यें वेदांतील राष्ट्रीसूक्ताचा अर्थ दिला आहे. लोकांचा राष्ट्रामध्यें काय अधिकार आहे. राष्ट्र म्हणजे काय ? तें कसें उत्पन्न होतें व त्याची शक्ति कशी वाढतें, कोणते पुरुष राष्ट्रीय उन्नति करण्यास मदत करतात व राष्ट्रशक्ति कोणत्या पुरुषांच्याद्वारें प्रकाशित होते, वगैरे प्रश्नाचीं समर्पक उत्तरें ह्या सूक्तामध्यें आलेलीं आहेत; शिवाय राष्ट्रभक्ति कशी करावी व परमेश्वरोपासना कशी करावी परमेश्वराची सर्व व्यापकता मनांत बाळगून जगांत कसें वागावें तेंहि ह्या सूक्तांत उत्तम दाखविलें आहे, ह्या पुस्तकांत मंत्रांतील भावार्थ स्पष्ट समजावा म्हणून प्रत्येक मंत्र त्याचें संस्कृत भाष्य, त्याचा अर्थ, भावार्थ व एकंदर सूक्ताचें स्पष्टीकरण करून सुलभ रीतीनें प्रतिपादन केलें आहे. पृष्ठें २६ असून किंमत फक्त दीड आणा आहे.

शामराव कृष्ण आणि मंडळी.
ठाकुरद्वार, मुंबई.

स्वस्त ! **चारी मूल वेद.** अति स्वस्त ! !

ज्या परम पित्यानें आमच्या हितार्थ पृथिव्यादि अनेक पदार्थ रचले त्यानेंच आमच्या जीवनसाहाय्यार्थ सृष्टीचे आरंभीं वेदद्वारें ज्ञानाचेंहि दान केलेंच आहे, आणि त्याच ज्ञानानें आम्हीं एक वेळ उन्नतीच्या शिखरावर चढलों होतों; पण हल्लीं ? वेदज्ञानाच्या परित्यागानेंच आम्ही अवनति भोगित आहों.

बायबल व कुराण ज्याच्या संग्रहीं नाहीं असा एक तरी ख्रिस्ती व महंमदानुयायी असेल काय ? मग ज्ञानाच्या शिखरावर नेऊन बसविणारे वेद ( आमचे धर्मग्रंथ ) आम्हां आर्यांच्या संग्रहीं नसावे ही किती लाजिरवाणी गोष्ट आहे !

| | कि. रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| चारी मूल वेद ... ... ... ... ... ... ... | ५ | ० | ० |
| चारी वेदांची अनुक्रमणिका ... ... ... ... ... ... | १ | ८ | ० |
| शतपथ ब्राह्मण संपूर्ण १४ कांड ( हा प्रसिद्ध आर्षग्रन्थ आजपर्यंत भारतवर्षांत छापलेला नव्हता ) मूलमात्र ... ... ... | ४ | ० | ० |
| दशोपनिषद् मूल ( एक पुस्तक ) ... ... ... ... ... | ० | १० | ० |
| निघण्टु-वेदांचा कोश, अकारादिक्रमानें अनुक्रमणिकेसहित ... ... | ० | ४ | ० |
| निरुक्त मूलमात्र ... ... ... ... ... ... ... | १ | ० | ० |
| अष्टाध्यायी मूलमात्र पाणिनि आचार्यकृत, शुद्ध केलेली ... ... | ० | ४ | ० |
| धातुपाठ, धातूंच्या अकारादिक्रमानें अनुक्रमणिकेसहित ... ... | ० | ५ | ० |

## मराठी पुस्तकें.

| | | | |
|---|---|---|---|
| वैदिकधर्मस्वरूप ... ... ... ... ... ... ... | १ | ० | ० |
| ईश्वरस्वरूप ... ... ... ... ... ... ... ... | ० | ० | ६ |
| ब्रह्मचर्य ... ... ... ... ... ... ... ... | ० | ४ | ० |
| राष्ट्रीय उन्नतीचीं तत्वें ... ... ... ... ... ... | ० | २ | ० |
| राष्ट्रीसूक्त ... ... ... ... ... ... ... ... | ० | १ | ६ |
| शतशब्दरत्नमाला, ईश्वरादि शंभरशब्दांच्या कविताबद्धव्याख्या, लहान मुलांस कंठ करविण्यास फारच उपयोगीं ... ... | ० | ० | ९ |
| देशाटन-ब्रह्मचारी नित्यानन्द यांचें व्याख्यान ... ... ... | ० | २ | ० |
| लोकमान्य अठरा पुराणें कोणीं लिहिलीं ? यांचें उत्तर ... ... | ० | ० | ३ |
| वैदिकसंध्योपासनविधि ... ... ... ... ... ... | ० | ० | ६ |

वरील पुस्तकांचें टपाल हांशील निराळें पडेल.

**शामराव कृष्ण आणि मंडळी, ठाकुरद्वार, मुंबई.**

मुंबई.-खेतवाडी मेनरोडवर घर नं. ८१ येथें "तत्त्वविवेचक" छापखान्यांत रा. भिवा हरी यांनीं मालकाकरितां छापिलें.